महाराष्ट्र जिल्हा नाविन्यता परिषदेचे गठन करण्याबाबत (Constitution of Maharashtra District Innovation council )

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः जिनाप-२११४/प्र.क्र.२ /२०१४/१४७१

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: १४ ऑगस्ट , २०१४

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः एसआयसी-२११३/प्रक्र.१/२०१३/१४७१, दिनांक ४ मार्च, २०१४

२) शासन निर्णय क्रमांकः डीएपी १०१४/प्र.क्र.६८/कार्यासन १४८१, दिनांक २७ जून, २०१४

**प्रस्तावना**

केंद्र शासनाने सप्टेंबर, २०१० मध्ये नॅशनल इनोव्हेशन कौन्सिलची स्थापना केलेली आहे. या कौन्सिलने केलेल्या शिफारशीनुसार शासन निर्णय क्रमांक एसआयसी-२११३/प्र.क्र.-१/२०१३/१४७१, दिनांक ४ मार्च, २०१४ अन्वये स्टेट इनोव्हेशन कौन्सिलची स्थापना करण्यात आलेली आहे. राज्यासाठी नव संकल्पनेचा आराखडा तयार करुन त्या संकल्पनांना मूर्तरुप देण्यासाठी पूरक वातावरण निर्मिती करणे, तसेच त्याबाबतचा प्रचार व प्रसार करण्यास सहाय्य करणे, नवीन संकल्पनांचा शोध घेण्यासाठी स्थानिक शाळा, विद्यापीठे तथा संशोधनात्मक संस्था यामधून तज्ज्ञांद्वारे विद्यार्थी व तरुणवर्गाला मार्गदर्शन करणे व पर्यायाने देशाच्या आर्थिक विकासास चालना देणे हे काम प्रामुख्याने स्टेट इनोव्हेशन कौन्सिलकडे सोपविण्यात आलेले आहे. स्टेट इनोव्हेशन कौन्सिलचे काम अधिक प्रभावीपणे होण्यासाठी ग्रामीण स्तरावर देखील याबाबतची जागृती करणे आवश्यक आहे. त्याकरीता कृषि, फलोत्पादन, स्वच्छता, सार्वजनिक आरोग्य, शिक्षण, पाणीपुरवठा या मूलभूत बाबीखेरीज दूरसंचार, पणन, जैवतंत्रज्ञान व सूक्ष्म तंत्रज्ञान, पर्यावरण , अपारंपारिक ऊर्जा तथा लोककलांचे जतन इत्यादि विविध क्षेत्रात ग्रामीण स्तरावर लोक जागृती करण्याची व सामान्य लोकांना या उपक्रमात सहभागी करुन

घेण्याची आवश्यकता आहे. त्याकरिता स्टेट इनोव्हेशन कौन्सिलला सहाय्यभूत ठरेल अशी जिल्हास्तरावर, जिल्हा नाविन्यता परिषद (DIC) स्थापन करण्याची बाब शासनाच्या विधाराधीन होती.

याबाबत सर्वकष विचार करुन शासनाने सर्व जिल्ह्यांसाठी खालीलप्रमाणे जिल्हा नाविन्यता परिषद स्थापन करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

## शासन निर्णय

जिल्हा नाविन्यता परिषदेमध्ये खालील सदस्यांचा अंतर्भाव असेल

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २) | मुख्य कार्यकारी अधिकारी | सदस्य |
| ३) | स्टेट इनोव्हेशन कौन्सिलचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४) | जिल्हा पोलीस अधिक्षक | सदस्य |
| ५) | जिल्हा कृषि अधिकारी | सदस्य |
| ६) | जिल्हा आरोग्य अधिकारी | सदस्य |
| ७) | जिल्हा उद्योग अधिकारी | सदस्य |
| ८) | प्रादेशिक विद्यापिठातील उप कुलगुरु | सदस्य |
| ९) | प्रादेशिक कृषि/ तांत्रिक विद्यापिठातील उप कुलगुरु | सदस्य |
| १०) | मान्यवर अशासकीय संस्थेतील नामनिर्देशित व्यक्ती | सदस्य |
| ११) | प्रतिथयश, प्रगतीशील शेतकरी/मच्छिमार तथा नवसंकल्पनेचा प्रवर्तक | सदस्य |
| १२) | सक्रिय महिला सहाय्य बचत गटातील प्रतिनिधी | सदस्य |
| १३) | जिल्हा नियोजन अधिकारी | सदस्य सचिव |

याखेरीज जिल्हा नाविन्यता परिषदेला आवश्यकतेनुसार २ विशेष सदस्य या बैठकीकरिता निमंत्रित करता येतील. तसेच सदस्य सचिवांना त्यांच्या कामात तांत्रिक/संगणकीय इत्यादी बाबींमध्ये सर्वतोपरी सहाय्य करण्यासाठी निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात ( प्रथमत: ३ वर्षासाठी )

सल्लागार/संगणकीय सहाय्यक उपलब्ध करुन घेण्याची जिल्हाधिकाऱ्यांना मुभा असेल. मात्र, याकरिता मानधन तथा वेतन अनुज्ञेय न करता सल्लागाराच्या शुल्कानुसार त्याचे प्रदान जिल्हा नाविन्यता परिषदेच्या निधीतून स्वतंत्रपणे करण्यात येईल.

या परिषदेची उद्दिष्टे,कार्ये व कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

**उद्दिष्टे :-**

जिल्हा नाविन्यता परिषद ( District Innovation Council ) जिल्ह्याचा सर्वांगीण विकास घडवून आणण्यासाठी नवीन संकल्पनांना प्रोत्साहित करेल . जिल्हा स्तरावरील सर्व विभागांकरिता ही परिषद मार्गदर्शक म्हणून एकछत्री भूमिका बजावेल व जिल्ह्यातील गुणवत्ता , कला, उपक्रमशिलता, उद्योगशिलता, नैसर्गिक साधनसंपत्ती यांचा प्रभावीपणे वापर करेल . याखेरीज शाळा, महाविद्यालये, कारखाने, शिक्षण व संशोधन संस्था यांच्यात समन्वय साधून विद्यार्थी, तथा तरुण बुध्दीजीवी वर्गाला नवीन संकल्पनांचा शोध घेण्यासाठी ही परिषद प्रवृत्त करेल व बक्षिस पात्र संकल्पनाना बक्षिसे देऊन त्यांचा गौरव देखील करेल. जिल्ह्याच्या व पर्यायाने देशाच्या आर्थिक विकासास चालना देण्यासाठी ही परिषद प्रयत्नशिल राहील.

**कार्ये** :-

१) जिल्हा नाविन्यता परिषद ही स्टेट इनोव्हेशन कौन्सिलला त्यांच्या कार्यात सहकार्य करेल.

२) जिल्हा स्तरावरील नव्या संकल्पनांकरिता ही परिषद, पूरक वातावरण निर्मिती करेल.

३) जिल्हयाकरिता नवीन संकल्पनांचा आराखडा तयार करेल.

४) ग्रामीण स्तरावरील स्थानिक कौशल्ये तसेच नवीन संकल्पना शोधून त्यांना मूर्तरुप देण्यासाठी संबंधितांना प्रोत्साहित करेल, .मार्गदर्शन करेल तसेच बक्षिसपात्र संकल्पनांची निवड करुन त्यांना शिष्यवृत्ती, आर्थिक सहाय्य तथा बक्षिसे देऊन त्यांचा गौरव करेल

५) स्थानिक शाळा, महाविद्यालये , विद्यापीठे, संशोधन व विकासात्मक संस्थेतील विद्यार्थी तथा तरुण बुध्दिजीवी वर्गाला मार्गदर्शन करण्याकरिता सेमिनार / कार्यशाळा व व्याख्याने आयोजित करेल.

६) जिल्ह्यातील स्थानिक उद्योगांना प्रोत्साहित करेल.

७) स्टेट इनोव्हेशन पोर्टलकरिता उपयुक्त ठरणारे जिल्हा नाविन्यता परिषदेचे पोर्टल विकसित करेल.

**कार्यकक्षा :-**

जिल्हा नावित्यता परिषद ही स्टेट इनोव्हेशन कौन्सिलला त्यांच्या कार्यात सहकार्य करेल. जिल्हा स्तरावर नवीन संकल्पना राबविण्यासाठी शासन निर्णय क्रमांक डीएपी १०१४/प्र.क्र ६८/कार्यासन १४८१, दिनांक २७ जून, २०१४ अन्वये जिल्ह्यासाठी प्राप्त नाविन्यपूर्ण योजनाकरिताच्या ४.५% नियतव्ययापैकी प्रत्येक जिल्ह्यासाठी डिस्ट्रिक्ट इनोव्हेशन फंड म्हणून उपलब्ध करुन देण्यात आलेला ०.५% नियतव्यय, या प्रयोजनासाठी उपयोगात आणण्यात येईल. याखेरीज व्यावसायिक क्षेत्रातून सामाजिक दायित्वाद्वारे प्राप्त होणा-या देणग्या तसेच राज्य व केंद्रशासनाकडून प्राप्त होणारा निधी याद्वारे या निधीची व्याप्ती वाढविण्यासाठी जिल्हा नाविन्यता परिषद प्रयत्नशिल राहील. समाज जीवन उंचावण्यासाठी व लोकाभिमुख प्रशासनाच्या दृष्टीने कार्य करण्यासाठी जिल्हा नाविन्यता परिषद कटिबध्द असेल.

जिल्हा नाविन्यता परिषद, नव संकल्पना राबविण्यासाठी प्रामुख्याने खालील क्षेत्रांचा विचार करेल :-

कृषि, फलोत्पादन, शिक्षण, सार्वजनिक आरोग्य, पिण्याचे शुध्दपाणी, आर्थिकवृध्दी, दारिद्रय, असमानता, नागरीकरण, वित्त, दूरसंचार, जैवतंत्रज्ञान, सुक्ष्म जैवतंत्रज्ञान, अपारंपारीक उर्जा, या व्यतिरिक्त नवीन संकल्पना राबविण्यासाठी इतर कोणत्याही क्षेत्राचा विचार या परिषदेला करता येईल.

जिल्हा नाविन्यता परिषदेचा निधी वापरण्याबाबत मार्गदर्शक सुचना :-

१) १३ व्या वित्त आयोगाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार जिल्हा नाविन्यता परिषदेचा निधी ( District Innovation Fund ) उपयोगात आणण्यात यावा.

२) हा निधी प्रामुख्याने पायाभूत सुविधांचे भांडवली मूल्य वर्धित करण्यासाठी उपयोगात आणण्यात यावा. मात्र नवीन भांडवली गुंतवणूक करण्यासाठी हा निधी वापरण्यात येऊ नये.

३) समाजातील सर्व स्तरावरील लोकांना उपयुक्त ठरतील अशा स्वरुपाच्या नव्या संकल्पना राबविण्यासाठी प्रामुख्याने या निधीचा वापर करण्यात यावा.

४) या निधी अंतर्गत सुरु करावयाचे प्रकल्प हे प्रामुख्याने मागणी धार्जिणे असावेत.

५) जिल्हा नाविन्यता परिषदे अंतर्गत प्राप्त होणारा निधी प्रत्येक जिल्ह्यासाठी स्वतंत्र बँक खाते उघडून त्यात वर्ग करण्यात यावा. या खर्चाचा ताळमेळ तथा लेखापरीक्षा याबाबतची जबाबदारी जिल्हा नियोजन अधिकारी यांची राहील.

६) जिल्हा नाविन्यता परिषदेची बैठक ३ महिन्यांतून किमान एकदा आयोजित करण्यात यावी व परिषदेने आपल्या कामाचा तिमाही अहवाल स्टेट इनोव्हेशन कौन्सिलला सादर करावा. आपल्या नवीन संकल्पनांच्या प्रयोजनार्थ जिल्हा नाविन्यता परिषदेला आवश्यकतेनुसार ५ ते ७ सदस्यांची कार्यकारी समिती स्थापन करण्याची मुभा असेल. या समितीच्या अशासकीय सदस्यांना प्रवास व दैनिक भत्ता हा शासनाच्या उपसचिव दर्जाच्या अधिका-यांना अनुज्ञेय असलेल्या प्रवास व दैनिक भत्त्याप्रमाणे अनुज्ञेय करण्यात यावा व त्याकरिता होणारा खर्च जिल्हा नाविन्यता परिषदेच्या निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१४१५२६३७०११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anuradha Ravindra Patil

Digitally signed by Anuradha Ravindra Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anuradha Ravindra Patil
Date: 2014.08.14 15:24:50 +05'30'

(अनुराधा पाटील)

उप सचिव, नियोजन विभाग

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, मुंबई

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. उपमुख्यमंत्री यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई

४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई

५. डॉ.रघुनाथ माशेलकर, CSIR, नॅशनल केमिकल लॅबोरेटरी, पाषाण रोड, पुणे

६. सचिव, सायन्स अॅन्ड टेक्नॉलॉजी विभाग, शहीद जीत सींग मार्ग,नवी दिल्ली-११००१६

७. प्रादेशिक विद्यापीठातील उप कुलगुरु

८. प्रादेशिक कृषि / तांत्रिक विद्यापीठातील उप कुलगुरु

९. अध्यक्ष, MCCIA, ५०५, अे-वींग, एमसीसीआयए ट्रेड टॉवर, ४०३ सेनापती बापट मार्ग, पुणे, महाराष्ट्र- ४११ ०१६

१०. अध्यक्ष, CII , १०५ काकड चेंबर, डॉ.अॅने बेझंट रोड, वरळी, मुंबई-४०००१८

११. संचालक, आय.आय.टी. पवई , आदी शंकराचार्य मार्ग, मुंबई-४०००७६

१२. संचालक, इन्स्टीटयूट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजी, नाथलाल पारेख मार्ग, माटुंगा (पूर्व), मुंबई-४०००१९

१३. संचालक, IISER, डॉ.होमी भाभा रोड, पाषाण, पुणे-४११००८

१४. अध्यक्ष, राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग, मुंबई

१५. सर्व विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई

१६. डॉ.राजेंद्र जगदाळे, महासंचालक, विज्ञान व तंत्रज्ञान पार्क,पुणे विद्यापीठ, पुणे

१७. महासंचालक, यशदा, पुणे

१८. सर्व विभागीय आयुक्त

१९. सर्व जिल्हाधिकारी

२०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी

२१. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई

२२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई

२३. महालेखापाल ( लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर

२४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर

२५. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२६. सहसंचालक, लेखा व कोषागारे, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद,अमरावती आणि नागपूर

२७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई

२९. सर्व सह/उप/अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

३०. सर्व कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

३१. निवडनस्ती कार्यासन-१४७१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई